वृध्दत्व आरोग्य व मानसिक आजार केंद्र, अंबाजोगाई जि. बीड या कार्यालयाकरीता "कार्यालय प्रमुख" आणि "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्याबाबत....

महाराष्ट्र शासन

सार्वजनिक आरोग्य विभाग

शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१९/ प्र. क्र. ३३९/आ ३अ

गो.ते.रुग्णालय संकुल, दहावा मजला, संकुल इमारत

मंत्रालय, मुंबई ४००००१

दिनांक : १३ मार्च, २०२०

वाचा :-

१. शासन निर्णय क्रमांकः पदनि २०१८/ प्र. क्र. १८५ /आरोग्य ४, दिनांक ६ जून , २०१९

२. संचालक, आरोग्य सेवा, यांचे पत्र क्र. संआसे/माआ/टे-४/आहरण व संवितरण अधिकारी/२१६७-६९ दिनांक १३.११.२०१९

३. संचालक, आरोग्य सेवा, यांचे पत्र क्र.संआसे/माआ/टे-४/अंबेजोगाई जि.बीड /आसंविअधि/ १९ दिनांक १३.०१.२०२०

प्रस्तावना :-

वृध्दत्व आरोग्य व मानसिक आजार केंद्र,अंबाजोगाई जि. बीड या कार्यालयाकरीता "कार्यालय प्रमुख "आणि "आहरण व संवितरण अधिकारी" घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होता. यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टामधील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उप विभाग-पहिला, अनुक्रमांक ३ येथील नियम- २ अन्वये प्रदान केलेल्या प्राधिकारास अनुसरुन, वृध्दत्व आरोग्य व मानसिक आजार केंद्र,अंबाजोगाई जि. बीड या कार्यालयाकरीता “वैद्यकीय अधीक्षक” या पदास “कार्यालय प्रमुख” म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम क्रमांक १५६ मधील तरतूदीनुसार “प्रशासकीय अधिकारी” या पदास “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभागाने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २३/२०२० /कोषा.प्रशा-५, दिनांक २७.०१.२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१११६५९०७५६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2020.03.13 12:26:46 +05'30'

**( रो.दि.कदम-पाटील )**

अवर सचिव , महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल ( लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर

२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई

३. संचालक, आरोग्य सेवा - १ , मुंबई

४. उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर

५. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड

६. जिल्हा शल्य चिकित्सक, बीड

७. वैद्यकीय अधीक्षक, वृध्दत्व आरोग्य व मानसिक आजार केंद्र,अंबाजोगाई जि. बीड

८. वित्त विभाग (विनियम कार्यासन), मंत्रालय, मुंबई

९. अवर सचिव (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई

१०.निवड नस्ती (आरोग्य ३अ)